# आरती श्रीसत्यनारायणाची

जय जय दीनदयाळा सत्यनारायण देवा। पंचारती ओवाळू श्रीपति तुज भक्तिभावा ॥
जय जय दीनदयाळा…॥ धृ ॥

विधियुक्त पूजुनी करिती पुराण श्रवण। परिमळ द्रव्यासहित पुष्पमाळा अर्पून ॥
धृतयुक्त शर्करामिश्रित गोधूमचूर्ण। प्रसाद भक्षण करिता प्रसन्न तू नारायणा ॥
जय जय दीनदयाळा…१

शतानंदविप्रे पूर्वी व्रत हे आचरिले। दरिद्र दवडूनी अंती त्याते मोक्षपदा नेले ॥
त्यापासुनि हे व्रत कलियुगी सकळां श्रुत झाले। भावार्थे पूजितां सर्वा ईच्छित लाभले ॥
जय जय दीनदयाळा…२

साधु वैश्ये संततिसाठी तुजला प्रार्थीले। इच्छित पुरता मधांध होऊनि व्रत न आचरिले ॥
त्या पापाने संकटी पडुनी दुःखहि भोगीले। स्मृति होऊनि आचरिता व्रत त्या तुवाचि उद्धरिले ॥
जय जय दीनदयाळा…३

प्रसाद विसरूनि पतिभेटीला कलावती गेली। क्षोभ तुझा होताचि तयांचि नौका बुडाली ॥
अंगध्वज राजासी यापरी दुःखस्थिती आली। मृतवार्ता शतपुत्रांची सत्वर कर्णी पसरली ॥
जय जय दीनदयाळा…४

पुनरपि पूजनी प्रसाद ग्रहण करिता तत्क्षणी। पतिची नौका तरली देखे कलावती नयनी ॥
अंगध्वज राजासी पुत्र भेटती येउनी। ऐसा भक्तां संकटि पावसि तू चक्रपाणी ॥
जय जय दीनदयाळा…५

अनन्य भावे पूजुनि हे व्रत जे नर आचरती। इच्छित पुरविसी त्यांते देउनि संतति संपत्ती ॥
संहरती भय दुरिते सर्वहि बंधने तुटती। राज रंक समान मानुनि पावसी श्रीपती ॥
जय जय दीनदयाळा…६

ऐसा तव व्रत अपार महिमा वर्णू मी कैसा। भक्तिपुरःसर आचरती त्यां पावसि जगदीशा।
भक्तांचा कनवाळू कल्पद्रुम तू सर्वेशा। मोरेश्वरसुत तुज विनवी भवनाशा ॥
जय जय दीनदयाळा…७

जय जय दीनदयाळा सत्यनारायण देवा। पंचारती ओवाळू श्रीपति तुज भक्तिभावा ॥
जय जय दीनदयाळा…॥ धृ ॥